उपविभागीय अधिकारी (स्थापत्य) या पदावर पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (शाखा अभियंता) यांना तात्पुरत्या स्थानिक स्वरूपात पदोन्नती देण्याबाबत. सन २०२१-२२ ची निवडसूची.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन आदेश क्रमांक : एसएलएस २०२१/प्र.क्र.३५/२०२१/आ(वर्ग-२)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २८ फेब्रुवारी, २०२२.

**आदेश :-**

कनिष्ठ अभियंता (शाखा अभियंता)(स्थापत्य) या निम्न संवर्गातून महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा गट "अ" मध्ये उपविभागीय अधिकारी (स्थापत्य) या पदावर रूपये ५६१००-१७७५००/- Pay Band S-२० या वेतनश्रेणीमध्ये खालील तक्त्यात नमूद अभियंत्यांना विहित अटी व शर्तीच्या अधिन राहून ते सविस्तर पदस्थापना दिलेल्या ठिकाणी ज्या दिनांकास रुजू होतील त्या दिनांकापासून तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देण्यात येत आहे:-

| अ. क्र. | जेष्ठता क्रमांक | अभियंत्यांचे नाव | प्रवर्ग | सध्या कार्यरत प्रदेश/मंडळ कार्यालयाचे नाव | महसूली विभाग वाटप नियमानुसार वाटप करण्यात आलेला महसूली विभाग | पदोन्नतीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ७ | ८ |
| १ | २६५१ | आण्णासाहेब रामदास आंधळे | वि.जा.भ.ज. | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक | नाशिक | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक |
| २ | २७६९ | प्रमोद मोतीराम खिरटकर | इ.मा.व. | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर | नागपूर | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर |
| ३ | ३१५५ | राजु दुर्गादास पत्की | खुला | मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, औरंगाबाद | औरंगाबाद | मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, औरंगाबाद |

**अटी व शर्ती -:**

(i) सदर पदोन्नती, पदोन्नत होणाऱ्या अधिकाऱ्यांना सेवा ज्येष्ठ असणाऱ्या अधिकाऱ्यांच्या व ज्यांची प्रकरणे विचारार्थ खुली ठेवण्यात आली आहेत अशा अधिकाऱ्यांच्या ज्येष्ठतेस बाधा न आणता देण्यात येत आहेत.

(ii) उपविभागीय अधिकारी (स्थापत्य) पदावरील पदोन्नतीमुळे, संबंधित अभियंता हे नियमित पदोन्नतीसाठी पात्र आहेत असा याचा अर्थ होत नाही व या तात्पुरत्या स्वरुपातील पदोन्नतीमुळे नियमित पदोन्नतीचे कोणतेही हक्क त्यांना प्राप्त होणार नाहीत. तसेच भविष्यात काही विभाग /उपविभाग बंद झाल्यामुळे पदे कमी झाल्यास किंवा अन्य कोणत्याही कारणास्तव पदावनत करण्याची आवश्यकता भासल्यास तेव्हा कोणतीही नोटीस न देता कनिष्ठतम अधिकाऱ्यांना, शेवटच्यास प्रथम (Last come first go) या तत्वानुसार पदावनत करण्यात येईल.

(iii) सदर पदोन्नती, उपरोक्त तक्त्यात नमूद अभियंत्यांविरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी/ शिस्तभंग विषयक कार्यवाही चालू अथवा प्रस्तावित नसल्याच्या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे. तथापि, सदर अभियंत्यांविरूध्द या आदेशाच्या दिनांकास विभागीय चौकशी चालू अथवा प्रस्तावित असल्यास; हे पदोन्नती आदेश आपोआप रद्द होतील.

(iv) संबंधित कनिष्ठ अभियंता (शाखा अभियंता) यांच्या उपविभागीय अधिकारी (स्थापत्य) या पदांवरील पदोन्नती मा. उच्च न्यायालय, मुंबई येथील रिट पिटीशन क्र. ८४५२/२००४ च्या निकालाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहतील. तसेच सदर पदोन्नती श्री. आर. के. सबरवाल विरूध्द पंजाब सरकार या प्रकरणी शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार होत असलेल्या पुनर्विलोकनाच्या अधीन राहील. तसेच हे पदोन्नती आदेश निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ च्या अधीन राहून सामान्य प्रशासन विभागाने दिनांक ०७.०५.२०२१ रोजीच्या पत्रान्वये दिलेल्या सूचनांनुसार करण्यात येत आहेत.

(v) **या आदेशानुसार पदोन्नत अभियंत्यांना सविस्तर पदस्थापना देण्याचे अधिकार संबंधित मुख्य अभियंता यांना देण्यात येत आहेत. सदर अभियंते माहे, फेब्रुवारी, २०२२ अखेर सेवानिवृत्त होत असल्याने; संबंधित मुख्य अभियंता उपरोक्त उपविभागीय अधिकारी पदावरील सविस्तर पदस्थापनेचे आदेश आजच निर्गमित करण्याची कार्यवाही करण्यात यावी. तसेच उपरोक्त पदोन्नत अभियंत्यांना सविस्तर पदस्थापना देताना संबंधित मुख्य अभियंता यांनी पदोन्नत अधिकाऱ्यांच्या सेवानिवृत्तीचा कालावधी विचारात घेऊन तात्काळ सध्या कार्यरत असलेल्या कार्यालयात/उप विभागातील रिक्त पदी पदस्थापना देण्याची कार्यवाही करावी. तसेच सविस्तर पदस्थापनेचे आदेश निर्गमित करण्यापूर्वी पदोन्नत अधिकाऱ्यांनी दि.३१.०३.२०२२ अखेरचे मत्ता व दायित्व विवरणपत्र सादर केल्याची खातरजमा करुन निर्गमित करावेत. उपरोक्त पदोन्नत अभियंत्यांनी सविस्तर पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रूजू व्हावे. त्याबाबतचा एकत्रित अहवाल संबंधित मुख्य अभियंता ८ दिवसांच्या आत शासनास सादर करावा.**

(vi) सदर पदोन्नती जरी तात्पुरती असली तरी कालांतराने ती नियमित होत असल्यामुळे जे अभियंते पदोन्नती नाकारतील, त्यांना सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ देण्यात आला असल्यास तो काढून घेण्यात येईल, याची संबंधितांना लेखी जाणीव करून द्यावी. संबंधित पदोन्नत कनिष्ठ अभियंता (शाखा अभियंता) यांनी उपविभागीय अधिकारी (स्थापत्य) पदावरील पदोन्नती नाकारल्यास त्याबाबतचा अहवाल तात्काळ शासनास सादर करावा.

(vii) उपविभागीय अधिकारी (स्था.) पदावरील सविस्तर पदस्थापनेचे आदेश प्राप्त झाल्यानंतर पदोन्नत अभियंत्यांना तात्काळ कार्यमुक्त करण्याची जबाबदारी संबंधित विभागाच्या कार्यकारी अभियंता यांची राहील. याबाबत दिरंगाई झाल्यास, संबंधित कार्यकारी अभियंत्यास जबाबदार धरण्यात येईल.

(viii) उपविभागीय अधिकारी (स्था.) या पदावर देण्यात आलेली पदोन्नती, पदोन्नत अभियंत्याने नाकारल्यास त्यांचेबाबतीत सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १२.०९.२०१६ च्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करण्यात येईल.

(ix) पदोन्नती आदेशानुसार संबंधित विभागातून कार्यमुक्त होऊन पदोन्नतीने पदस्थापनेच्या पदावर रुजू होण्यासाठी आलेल्या अभियंत्यांना संबंधितांनी विनाविलंब रुजू करून घ्यावे. एखाद्या अभियंत्याला रुजू करून न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी ठरवून वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास याबाबत संबंधित कार्यकारी अभियंत्यांवर/आस्थापना अधिकाऱ्यावर त्याची जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

(x) सदर पदोन्नती ही तात्पुरती असून त्यांच्या मूळ संवर्गातील अंतिम ज्येष्ठतासूची प्रसिध्द होण्याच्या अधीन राहून करण्यांत येत आहेत. त्यामुळे संबंधितांना उपविभागीय अधिकारी (स्था.) संवर्गातील ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

(xi) उपविभागीय अधिकारी (स्थापत्य) या पदावरील पदोन्नती मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल रिट याचिका क्र.३३१०/२०२१ व इतर याचिकांमध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०२२८१५०००६५०२७ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

UDDHAV R DAHIPHALE

Digitally signed by UDDHAV R DAHIPHALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=05b3ca49b9a0a924fd4d8743e6e254e742308f02108527986e098afc27201f30, pseudonym=DDF7D61D2ADB9D0A26CF5E52D408A84E1CEB62A8, serialNumber=2D80774C9ED65ECA9BE69006934BFB5C4CA32AB0DC1A2EC5746398458BDF1C37, cn=UDDHAV R DAHIPHALE
Date: 2022.02.28 15:02:56 +05'30'

**( उध्दव रं. दहिफळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रधान सचिव (जलसंपदा प्रकल्प व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
२) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
३) सचिव (समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
४) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई, (पत्राने)*
५) प्रधान सचिव/सचिव, सामान्य प्रशासन विभाग (१२ व १६ ब), मंत्रालय, मुंबई.
६) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक.
७) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर.
८) मुख्य अभियंता (जसं), जलसंपदा विभाग, औरंगाबाद.
९) उप सचिव(प्रशा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
१०) संबंधित अधिकारी यांना (संबंधित कार्यालयामार्फत).
११) कार्यासने-आ(तांत्रिक)/आ(शा.अ.)/गोपनीय,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई.
१२) आ.(वर्ग-२) कार्यासन, संग्रहार्थ.